**श्री. सरफराज खान (भा.व.से.), व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागात प्रत्यावर्तित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मौआम-२०१४/प्र.क्र.१२१/का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १० नोव्हेंबर, २०१४.

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग, मौआम-२०१४/प्र.क्र.१२१/का.८, दि.२०.०८.२०१४.

२) कार्यालयीन आदेश क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग, मौआम-२०१४/प्र.क्र.१२१/का.८, दि.६ सप्टेंबर, २०१४.

३) श्री. सरफराज खान (भा.व.से.), व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांचे दि.३.११.२०१४ रोजीचे निवेदन.

**शासन निर्णय-**

श्री. सरफराज खान (भा.व.से.), व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांची व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ या रिक्त पदावर संदर्भ क्रमांक १ अन्वये नियुक्ती करण्यात आली होती.

श्री. सरफराज खान (भा.व.से.), व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांनी त्यांच्या दि.३.११.२०१४ रोजीच्या निवेदनान्वये त्यांना मूळ विभागात प्रत्यावर्तित करावे, अशी विनंती केली आहे. त्यास अनुसरुन या आदेशाव्दारे श्री. सरफराज खान यांना महसूल व वन विभागात प्रत्यावर्तीत करण्यात येत आहे. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

श्री. सरफराज खान, यांना प्रत्यावर्तीत केल्यानंतर रिक्त होणाऱ्या, व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई या पदाचा अतिरिक्त कार्यभार या विभागात सहसचिव या पदावर कार्यरत श्रीम. अैनुल अत्तार यांचेकडे तात्पुरत्या स्वरुपात सोपविण्यात येत आहे. श्री. खान यांनी व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई या पदाचा कार्यभार श्रीमती अैनुल अत्तार, सहसचिव यांचेकडे सुपूर्द करावा. व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई या पदावर

अन्य व्यक्तीची नेमणूक करण्यात आल्यानंतर आपोआप किंवा शासन आदेश देतील तेव्हा श्रीमती अैनुल अत्तार, सहसचिव यांचा सदर अतिरिक्त कार्यभार संपुष्टात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११०१५२६०१६७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2014.11.15 16:42:21 +05'30'

**( समीर साळुंखे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री, अल्पसंख्यांक विकास यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री, अल्पसंख्यांक विकास यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. अध्यक्ष, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव , महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सर्व संचालक, मौलाना आझाद अल्पंसख्यांक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई
१०. व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई
११. श्री. सरफराज खान (भा.व.से.), व्यवस्थापकीय संचालक, मौ.आ.अ.आ.वि.महामंडळ, मुंबई.
१२. श्रीम. अैनुल अत्तार, सहसचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. सहसचिव/उपसचिव/अवरसचिव/कक्ष अधिकारी, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. कक्ष अधिकारी (सा.उ.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (का.८)